**पोलीस कर्मचा-यांच्या पाल्यांना पोलीस शिपाई भरतीमध्ये ५ टक्के आरक्षण ठेवणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः लवेसु-३६१३/प्र.क्र.२३८/पोल-५ अ

जागतिक व्यापार केंद्र,सेंटर-१,
कफ परेड,मुंबई ४०० ००५
दिनांक: २२ ऑगस्ट,२०१४.

**वाचा :**

1) **सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्रमांक:एसआरव्ही-१०९७/ प्र.क्र.३१/९८/१६-अ,दिनांक १६-३-१९९९.**

**प्रस्तावना:**

पोलीसांचे जोखमीचे काम असल्यामुळे त्यांना कुटुंबाकडे लक्ष द्यायलाही वेळ मिळत नाही. त्याची कदर करुन निवृत्त पोलीसांच्या मुलांसाठी काही टक्के आरक्षण ठेवावे तसेच सेवेत असताना पोलीस कर्मचा-याचे अकाली निधन झाल्यास त्यांच्या वारसाला पोलीस दलात नोकरी दिली जाते, परंतु, अनुकंपा तत्वाची प्रतिक्षा यादीच इतकी मोठी असते. पाच ते दहा वर्षे त्या मुलांना नोकरीची वाट पहावी लागते, यामुळे पदवीधर अंशकालीन उमेदवारांसाठी लागू असलेल्या १० टक्के समांतर आरक्षणामधून ५ टक्के आरक्षण हे पोलीस दलातील कर्मचा-यांच्या पाल्यांसाठी व पोलीस दलातील सेवेत असलेल्या अकाली निधन झालेल्या कर्मचा-यांच्या पाल्यासाठी अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी राखीव ठेवण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.त्यावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय:

(१) अंशकालीन पदवीधरांसाठी राखीव समांतर आरक्षणापैकी ३ टक्के आरक्षण हे पोलीस दलातील कर्मचा-यांच्या पाल्यांसाठी पोलीस भरतीत राखीव ठेवण्यात येत आहे.

(२) तसेच अंशकालीन पदवीधरांसाठी राखीव समांतर आरक्षणापैकी २ टक्के आरक्षण हे पोलीस दलातील शासन सेवेत कार्यरत असताना अकाली निधन झालेल्या कर्मचा-यांच्या पाल्यांसाठी, अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी राखीव ठेवण्यात येत आहे.

उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने महाराष्ट्र पोलीस शिपाई पदाच्या सेवाप्रवेश नियमात आवश्यक ती सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२५१२०८४१४३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Sampatrao Patankar

Digitally signed by Shivaji Sampatrao Patankar
DN: CN = Shivaji Sampatrao Patankar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2014.08.25 12:20:16 +05'30'

**(शिवाजी पाटणकर)**
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.उपमुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
४. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
६. अपर मुख्य सचिव (गृह), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
८. सर्व परिक्षेत्रिय विशेष पोलीस महानिरीक्षक,
९. सर्व पोलीस आयुक्त,
१०.सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक,
११.शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
१२.सर्व मंत्रालयीन विभाग.